**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण २७१४/प्र.क्र.३०२/२१.
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ डिसेंबर, २०१४.

**शासन निर्णय**

नवीन मंत्रीमंडळ अस्तित्वात आल्यानंतर मा.मुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांच्या कार्यालयांसाठी पदांचा आकृतीबंध निश्चित करुन सावधी पदे निर्माण करण्यात येतात. मा.मुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री महोदयांकडून त्यांचे कार्यालयात, वरील पदांवर अधिकारी/कर्मचा-यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत शिफारसपत्र प्राप्त झाल्यानंतर संबंधित उमेदवाराने धारण केलेले पद, सदर पदाची वेतनश्रेणी, नियुक्तीचा दिनांक, सेवानिवृत्तीचा दिनांक, विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित आहे किंवा कसे, त्यांचे मागील पाच वर्षांचे गोपनीय अहवाल समाधानकारक आहेत किंवा कसे, प्रतिनियुक्तीवर जाण्यासाठी संबंधित अधिकारी /कर्मचारी आणि त्यांचे विभागाची/कार्यालयाची संमती आहे किंवा कसे, प्रतिनियुक्तीवर काम केलेला कालावधी, मत्ता व दायित्वाचे वार्षिक विवरणपत्र सादर केले आहे किंवा इत्यादी बाबींची माहिती संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रशासकीय विभागाकडून प्राप्त घेऊन प्रस्ताव शासनाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात येतो.

२. वरील बाबीबरोबरच खालील बाब ही अधिकारी/कर्मचारी यांची मंत्री आस्थापनेवर नियुक्ती करताना विचारात घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

"मागील १० वर्षात ज्यांनी मा.मुख्यमंत्री/उपमुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांचे कार्यालयात खाजगी सचिव, विशेष कार्य अधिकारी व स्वीय सहायक म्हणून कार्य केले असेल त्यांना पुढील पाच वर्षे मंत्री आस्थापनेवर काम करता येणार नाही. अशा प्रकारची नियुक्ती झाली असल्यास त्यांना मूळ विभागात परत पाठविण्यात यावे. "

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०११४३४०९९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

GAVIT BHAURAO R

Digitally signed by GAVIT BHAURAO R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GAVIT BHAURAO R
Date: 2014.12.01 14:43:35 +05'30'

**( भा. र. गावित )**
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) प्रधान सचिव/सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
४) उप सचिव, मुख्यसचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर
६) खाजगी सचिव, सर्व मंत्री / राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई
७) सामान्य प्रशासन विभाग/का.१२,मंत्रालय,मुंबई
८) निवड नस्ती.